महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियम) अधिनियम २०१२ अंतर्गत नवीन शाळा मान्यता देणे व विद्यमान शाळेचा दर्जावाढ करण्यासाठी ऑनलाईन संगणक प्रणाली विकसित करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५१८/प्र.क्र.४७/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २९ जानेवारी, २०१९

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांक: ईगव्ह-१५१०/प्र.क्र.२४/संगणक, दि.२४.१०.२०१७
२) शासन निर्णय क्रमांकः एसएफएस-१०१६/प्र.क्र.१४२/एसएम-२, दि. १४ जूलै, २०१७.
३) आयुक्त शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शिआ/२०१८/स्वयंअर्थसहाय्यित शाळा प्रणाली/ आस्था क १४३/५४५१, दिनांक ८ ऑक्टोबर, २०१८.
४) शासन निर्णय क्रमांक :ईगव्ह-१५१८/प्र.क्र.४७/संगणक, दि.१ नोव्हेंबर, २०१८.
५) शिक्षण संचालक, माध्य व उच्च माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.अमाशा/स्वयंअर्थ/शाळा/प्रणाली/माध्य.क्र./३०१/१३१२७, दि.१४.१२.२०१८
६) आयुक्त शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शिआ/२०१९/स्वयंअर्थसहाय्यित शाळा प्रणाली/ आस्था क १४३/१६४, दिनांक ८ जानेवारी, २०१९.

प्रस्तावना :-

प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १२ सप्टेंबर, २०१७ रोजीच्या बैठकीतील निर्णयाप्रमाणे “नवीन स्वयंअर्थसहाय्यित शाळा सुरु करणे वा शाळांची दर्जावाढ करणे” ही कामे पार पाडण्यासाठी संगणक प्रणाली विकसित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्या अनुषंगाने सदर कामास उपरोक्त संदर्भ क्र.१ व ४ अन्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच NYSA Communication (P) Ltd. ने केलेल्या कामापोटी सदर संदर्भ क्र.४ अन्वये कंपनीला निधी वितरीत करण्यात आला आहे. आता आयुक्त, शिक्षण यांनी संदर्भ क्र.६ अन्वये केलेल्या मागणीच्या अनुषंगाने पुढील टप्प्याचे कामापोटी रु.३४,५१,६००/- इतका निधी कंपनीला वितरीत करण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

उपरोक्त संगणक प्रणाली विकसित व परिचालीत करण्यासाठी करारानुसार पुढील टप्प्याचे पूर्ण झालेल्या कामापोटी व संदर्भ क्र.६ अन्वये केलेल्या मागणीच्या अनुषंगाने खाली नमूद केल्याप्रमाणे रक्कम रुपये ३४,५१,६००/- वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशिल | देयकाची एकूण रक्कम |
|---|---|---|
| १. | NYSA Communication Pvt.Ltd. कंपनीने self finance school प्रणालीचा पूर्ण केलेल्या पुढील टप्प्याच्या कामापोटीची देयके पुढीलप्रमाणे<br>1) Invoice No.SESD/2018-19/NYSA-015, Dt.26.09.2018 Capex Cost Rs. 86,29,000/- चे 10%<br>2) Invoice No.SESD/2018-19/NYSA-015, Dt.25.10.2018 Capex Cost Rs. 86,29,000/- चे 30% | <br><br>रु.०८,६२,९००/-<br><br>रु.२५,८८,७००/- |
| | **एकूण रुपये** | रु.३४,५१,६००/- |

(अक्षरी रुपये चौतीस लाख एक्कावन्न हजार सहाशे फक्त)

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०१८-१९ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व शिक्षण संचालक, (माध्य.व उच्च माध्य.) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२९१२१०१२५२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2019.01.29 12:24:57 +05'30'

( प्रविण मुंढे )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) अ.मु.स., वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२) अ.मु.स., शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्विय सहायक मंत्रालय, मुंबई.
३) प्र.स., माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८) निवडनस्ती/ संगणक.